मोटार वाहन विभागाकडे उपलब्ध असलेल्या वाहनांचा राज्यस्तरीय वाहन आढावा...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०६१६/प्र.क्र.३७७/परि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १२ मे, २०१७

वाचा -

१) वित विभाग,शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०१४/प्र.क्र.९/१४/विनियम,दि.०४.०८.२०१४
२) वित विभाग,शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम,दि.२२.०८.२०१४
३) परिवहन आयुक्त कार्यालय यांचे क्रमांक:कावाआ/०१०९/नस्ती क्र.१/का-१०/ जा.क्र.९८४६, दि.१४.०६.२०१६
४) परिवहन आयुक्त कार्यालय यांचे क्रमांक:कावाआ/०१०९/नस्ती क्र.१/का-१०/ जा.क्र.१४८८२, दि.१४.०९.२०१६

**शासन निर्णय:**

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई आणि राज्यातील प्रादेशिक/उप प्रादेशिक परिवहन कार्यालयाकडे असलेल्या वाहनांचा आढावा घेण्याबाबतचा प्रस्ताव राज्यस्तरीय आढावा समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यानुसार परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई आणि राज्यातील प्रादेशिक/उपप्रादेशिक परिवहन कार्यालयासाठी एकूण १७४ वाहनांची आवश्यकता लक्षात घेऊन राज्यस्तरीय आढावा समितीच्या मान्यतेने खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार त्याखालील अटींच्या अधिन राहून वाहने अनुज्ञेय करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या | वाहन प्रकार | |
|---|---|---|---|---|
| | | | कार | जीप |
| १ | परिवहन आयुक्त | १ | १ | -- |
| २ | अपर परिवहन आयुक्त | १ | १ | -- |
| ३ | सह परिवहन आयुक्त | १ | १ | -- |
| ४ | उप आयुक्त (लेखा) | १ | १ | -- |
| ५ | परिवहन उप आयुक्त | ४ | ४ | -- |
| ६ | सहायक पोलीस आयुक्त | १ | १ | -- |
| ७ | प्रादेशिक परिवहन अधिकारी | ११ | ११ | -- |
| ८ | उप प्रादेशिक परिवहन अधिकारी | ५३ | ५३ | -- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ९ | वायुवेग पथक | -- | -- | ६७ |
| १० | वायु प्रदुषण पथक | -- | -- | १० |
| ११ | सीमा तपासणी नाके | -- | -- | २४ |
| | | एकूण | ७३ | १०१ |

१. जुने वाहन निर्लेखित करुन नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावास रितसर शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील.
२. जुने वाहन निर्लेखनाच्या प्रस्तावास प्राधिकृत अभिकरणाची मान्यता असावी.
३. वाहनांची खरेदी शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात यावी.
४. नव्याने वाहन चालकांची पदे निर्माण करता येणार नाही.
५. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक-१९-क नियम क्रमांक - ६९ मधील अटीनुसार वाहन निर्लेखित ठरविण्याची कार्यवाही करण्यात यावी.
६. सदर वाहन खरेदीकरीता मंजूर अनुदानातून खर्च करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्र.४७०/विनियम, दि.२३.०९.२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१११६३०४५६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tikamdas N. Shikharame

Digitally signed by Tikamdas N. Shikharame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=12c50633547b609d1eafa52a6f58635e0b53088462877241f83faca5a99dd3a6, cn=Tikamdas N. Shikharame
Date: 2017.05.12 16:49:28 +05'30'

(टि.न.शिखरामे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५. मा.अध्यक्ष/ मा.उपाध्यक्ष,विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन,मुंबई
६. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव,विधान भवन,मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

८. सर्व सन्माननीय विधानसभा/विधान परिषद सदस्य
९. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय,मुंबई
१०.परिवहन आयुक्त,महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. प्रधान सचिव (परिवहन) यांचे स्वीय सहायक
१२.निवडनस्ती (परिवहन-४).